**धर्मादाय संघटनेतील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड कर्मचाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे / अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करण्याकरीता "पुनर्विलोकन समिती" तसेच सेवा पुनर्विलोकनानंतर मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या निर्णयाविरुध्दच्या अभिवेदनावर विचार करण्याकरिता "अभिवेदन समिती" गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएचए २०२३/प्र.क्र.९३/का.१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ९ जुलै, २०२४

**पहा :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र : एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दि.१०.०६.२०१९
२) धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.आस्था/लेखा-१०४१/२३, दि. २२.०२.२०२३
३) विधि व न्याय विभाग, शासन आदेश क्र. सीएचए-२०२३/प्र.क्र.१६०/कार्या-१, दि. १४.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या, संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम १०(४) व नियम ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना, वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी, त्यांचे सेवा पुनर्विलोकन करुन मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याबाबत एकत्रित कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार धर्मादाय संघटनेतील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड कर्मचाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे/अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करण्याकरीता "पुनर्विलोकन समिती" तसेच सेवा पुनर्विलोकनानंतर मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या निर्णयाविरुध्दच्या अभिवेदनावर विचार करण्याकरिता "अभिवेदन समिती" गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

धर्मादाय संघटनेतील गट-ब (अराजपत्रित) व गट-क चे कर्मचारी आणि मुंबई विभागातील गट-ड कर्मचाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे/अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करण्याकरीता "पुनर्विलोकन समिती" तसेच सेवा पुनर्विलोकनानंतर मुदतपूर्व

सेवानिवृत्तीच्या निर्णयाविरुध्दच्या अभिवेदनावर विचार करण्याकरिता "अभिवेदन समिती" पुढीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

**पुनर्विलोकन समिती क्र.१**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | धर्मादाय सह आयुक्त-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २. | धर्मादाय सह आयुक्त, बृहन्मुंबई विभाग, मुंबई | सदस्य |
| ३. | उप नगरपाल, नगरपाल यांचे कार्यालय मुंबई | सदस्य |
| ४. | अधीक्षक (आस्थापना), मुख्यालय, मुंबई | सदस्य सचिव |

**अभिवेदन समिती क्र.१**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २. | उप निबंधक, भागीदारी संस्था, मुंबई | सदस्य |
| ३. | धर्मादाय उप आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य सचिव |

२. तसेच धर्मादाय संघटनेच्या विभागीय कार्यालयातील व त्यांच्या अधिनस्त कार्यालयातील (मुंबई विभाग वगळून) गट-ड च्या कर्मचाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे/ अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करण्याकरीता "पुनर्विलोकन समिती" तसेच सेवा पुनर्विलोकनानंतर मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या निर्णयाविरुध्दच्या अभिवेदनावर विचार करण्याकरिता "अभिवेदन समिती" पुढीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

**पुनर्विलोकन समिती क्र.२**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | धर्मादाय उप आयुक्त, नाशिक / पुणे / कोल्हापूर / छत्रपती संभाजीनगर / लातूर / नांदेड / अमरावती / नागपूर | अध्यक्ष |
| २. | सहायक धर्मादाय आयुक्त, नाशिक / पुणे / कोल्हापूर / छत्रपती संभाजीनगर / लातूर / नांदेड / अमरावती / नागपूर | सदस्य |
| ३ | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी गट-ब (राजपत्रित), स्थानिक निधी लेखापरीक्षा नाशिक/ पुणे/ कोल्हापूर/ छत्रपती संभाजीनगर/ लातूर/ नांदेड/ अमरावती/ नागपूर | सदस्य |
| ४. | अधीक्षक (आस्थापना), नाशिक / पुणे / कोल्हापूर / छत्रपती संभाजीनगर/ लातूर / नांदेड / अमरावती / नागपूर | सदस्य सचिव |

**अभिवेदन समिती क्र.२**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | धर्मादाय सह आयुक्त, नाशिक / पुणे / कोल्हापूर / छत्रपती संभाजीनगर / लातूर / नांदेड / अमरावती / नागपूर | अध्यक्ष |
| २. | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील सहायक संचालक गट-अ (कनिष्ठ) स्थानिक निधी लेखा परीक्षा, नाशिक / पुणे / कोल्हापूर / छत्रपती संभाजीनगर / लातूर / नांदेड / अमरावती / नागपूर | सदस्य |
| ३. | सहायक धर्मादाय आयुक्त, नाशिक / पुणे / कोल्हापूर / छत्रपती संभाजीनगर / लातूर / नांदेड / अमरावती / नागपूर | सदस्य सचिव |

३. सामान्य प्रशासन विभागाने दिनांक १०.०६.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७०९१३०५३१८५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b4646311d3a20fa0e8638f40554d1f74d87b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=46C6AAD763D6F6FE01CAEF299F7BF533D85983B1491695AAAE025643F38D12D4, cn=MANISHA ANIL KADAM
Date: 2024.07.09 13:16:51 +05'30'

**( मनिषा अ. कदम )**
**सहायक सॉलिसिटर-नि-उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
२. मा. उपमुख्यमंत्री (विधि व न्याय) महोदयांचे सचिव.
३. महालेखापाल, लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
४. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सर्व धर्मादाय सह आयुक्त/धर्मादाय उप आयुक्त/सहायक धर्मादाय आयुक्त (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत)
६. सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय, सर्व जिल्हे (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).
७. उप नगरपाल, नगरपाल यांचे कार्यालय मुंबई
८. उप निबंधक, भागीदारी संस्था, मुंबई
९. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. वित्त विभाग (कोषा प्रशा-२), मंत्रालय, मुंबई.
११. विधि व न्याय विभाग (कार्यासन ९/१५/१७/२३/२४/२५), मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का-१).